महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ, (कृषि उप संचालक) संवर्गातील, दिनांक १/१/२०११ स्थित तात्पुरती अतिरिक्त ज्येष्ठतासूची.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन परिपत्रक क्र.आकृवि- १२१४/प्र.क्र.४१८(२)/१५अे**
**मंत्रालय(विस्तार), मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- १४ नोव्हेंबर, २०१४**

**वाचा :-** **१)** कृषि आयुक्तालयाचे पत्र.क्र. अेईएक्स/प्र.क्र. १/ज्ये.सु. -१०/ गट-अ/ आस्था-१/८४८, दिनांक १२/६/२०१४

**परिपत्रक**

भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३०९ च्या पंरतुकान्वये, प्रदान करण्यात आलेल्या शक्तीचा वापर करून कृषि व पदुम विभागाच्या कृषि आयुक्तालयाच्या आस्थापनेवरील,महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ (कृषि उप संचालक) या संवर्गात दिनांक १/१/२०१० ते दिनांक ३१/१२/२०१० या कालावधीत पदोन्नतीने नियुक्त झालेल्या अधिका-यांची नांवे अंतर्भूत करून दिनांक १/१/२०११ स्थित तात्पुरती अतिरिक्त ज्येष्ठतासूची खालील अटीच्या अधीन प्रसिद्ध करण्यात येत आहे.

(अ) ज्येष्ठतासूची मध्ये प्रस्तावित करण्यात आलेले मानीव दिनांक हे फक्त सेवाज्येष्ठतेसाठी प्रस्तावित आहे. पदोन्नती ही सेवा प्रवेश नियमातील तरतुदीनुसार असल्याने, केवळ ज्येष्ठतेसाठी मानीव दिनांक प्राप्त झाला म्हणून पदोन्नतीसाठी पात्र आहे, असे गृहीत धरून त्या अनुषंगाने कोणतेही लाभ देय राहणार नाही.

(ब) महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ संवर्गातील ज्येष्ठतेच्या संदर्भात मा. लोकआयुक्त / शासनस्तरावर तसेच वेगवेगळ्या न्यायधिकरण / न्यायालयातील न्यायनिर्णयाच्या अधिन राहून, तात्पुरती ज्येष्ठतासूची निर्गमित करण्यात येत आहे.

सोबत जोडलेल्या ज्येष्ठतासूचीवर संबंधीत अधिका-यांनी आपले आक्षेप /सूचना असल्यास , सदर परिपत्रक प्राप्त झाल्यापासून पंधरा (१५) दिवसात कृषी, आयुक्तालया मार्फत शासनास सादर करावेत. विहित मुदती नंतर प्राप्त झालेल्या निवेदनावर विचार करण्यात येणार नाही ,याची कृपया नोंद घ्यावी.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra, gov.in वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१४१११४१६१२०७८३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Vilas Dattatreya Thakur

Digitally signed by Vilas Dattatreya Thakur
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas Dattatreya Thakur
Date: 2014.11.17 11:59:46 +05'30'

( वि. द. ठाकूर )
**अवर सचिव ,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती)
२) सर्व , विभागीय कृषि सह संचालक, (मार्फत आयुक्त, कृषि, कृषि आयुक्तालय, पुणे )
३) सर्व, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (मार्फत आयुक्त, कृषि, कृषि आयुक्तालय, पुणे )
४) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
५) संबंधीत अधिकारी (द्वारा आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे)
६) निवड नस्ती /१५अे

| शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही-२०११/प्र.क्र.२८४/१२, दिनांक २१/१०/२०११ सोबतचे प्रपत्र-अ | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **कृषि विभागातील महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ संवर्गातील अधिका-यांची दिनांक १/१/२०११ रोजीची तात्पूरती अतिरिक्त (Provisional additional ) ज्येष्ठतासुची** | | | | | | | | | | |
| महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ संवर्गात दिनांक १/१/२०१० ते दिनांक ३१/१२/२०१० या कालावधीत नियुक्त झालेल्या महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ संवर्गाची ज्येष्ठतासुची | | | | | | | | | | |
| अ. क्र. | ज्येष्ठता क्रमांक. दिनांक १.१.१० स्थित अंतरिम ज्येष्ठता सुचीच्या अनुषंगाने | नांव | प्रवर्ग (नियुक्तीनंतर प्रवर्ग बदलला असल्यास त्याचा दिनांक) | जन्म तारीख | नियुक्ती दिनांक | नियुक्तीचा मार्ग (सरळसेवेने/ मर्यादीत विभागीय परिक्षेव्दारे नियुक्त उमेदवारांचा गुणवत्ता क्रमांक व परिक्षेचे वर्ष) | ज्येष्ठता दिनांक/ ज्येष्ठतेचा मानीव दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | अभिप्राय |
| **१** | **२** | **३** | **४** | ५ | **६** | **७** | ८ | **९** | **१०** | ११ |
| १ | ९१९ | फड हरिराम भानुदास | भ.ज.(ड) | २७.०६.६२ | ११.०१.१० | तदर्थ पदोन्नती | | ३०.०६.२०२० | एम.एस्सी (कृषि) | |